राज्यात दि. २६ नोव्हेंबर ते दि. २ डिसेंबर या कालावधीत संविधान सप्ताह साजरा करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांक:- बैठक-२०१८/प्र.क्र.२१७/समन्वय

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १६ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना:-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीचे औचित्य साधून दि. २६ नोव्हेंबर हा दिवस "संविधान दिन" म्हणून साजरा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने सन २०१८ मध्ये दि. २६ नोव्हेंबर, २०१८ हा दिवस "संविधान दिन" म्हणून साजरा करण्यासाठी मा. मंत्री (सा. न्या.) यांच्या अध्यक्षतेखाली दि. १६ ऑक्टोबर, २०१८ व दि. १३ नोव्हेंबर, २०१८ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकींमध्ये सन २०१८ या वर्षी दि. २६ नोव्हेंबर, २०१८ पासून राज्यामध्ये संविधान सप्ताह साजरा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने संविधान सप्ताहामध्ये पुढीलप्रमाणे कार्यक्रम राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०१८ मध्ये दि. २६ नोव्हेंबर ते दि. २ डिसेंबर या कालावधीत "संविधान सप्ताह" साजरा करण्याचा निर्णय घेण्यात आला असून, सदर सप्ताहामध्ये पुढीलप्रमाणे कार्यक्रम राबविण्यात यावेत.

| दिनांक | कार्यक्रम | कार्यक्रम राबविणारी यंत्रणा |
|---|---|---|
| दि. २६/११/ २०१८ | "संविधान वाचन" (ठिकाण:- शाळा, विद्यालय, महाविद्यालय, कारागृह) किंवा जिल्हा निहाय "संविधान जागर" प्रभात फेरी (विद्यालयाच्या सहकार्याने) | शालेय शिक्षण विभाग/ उच्च व तंत्र शिक्षण विभाग/ डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे, |
| | संविधान गौरव रॅली (डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन, नागपूर ते संविधान चौक, नागपूर) व सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करणे. | डॉ. बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठान, नागपूर |
| | चित्ररथ तयार करणे | डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे, |

| | | |
|---|---|---|
| दि. २७/११/२०१८ | तालुका स्तरीय पोलीस कार्यालय/ पंचायत समिति कार्यालय येथे संविधान प्रतींचे वाटप | ग्राम विकास विभाग/ डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| | संविधानावर आधारित पथनाट्य सादरीकरण (दि. २६/११/२०१८ ते ०१/१२/२०१८ या कालावधीत) | डॉ. बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठान, नागपूर व डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| दि. २८/११/२०१८ | जिल्हा व विभागीय स्तरावर वकृत्व स्पर्धेचे आयोजन | डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| | संविधान जलसा | डॉ. बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठान, नागपूर |
| दि. २९/११/२०१८ | संविधान गौरव एकपात्री प्रयोग स्पर्धा | डॉ. बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठान, नागपूर |
| दि. ३०/११/२०१८ | विभागीय स्तरावर निबंध स्पर्धा/गीत गायन स्पर्धा | डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| | दिव्यांग कला सादरीकरण | डॉ. बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठान, नागपूर |
| दि. १/१२/२०१८ | "भारतीय संविधान" आधारित प्रबोधन कार्यक्रम (ठिकाण- समाजकार्य महाविद्यालय, विधी महाविद्यालय) | डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| दि. २/१२/२०१८ | "संविधानातील मुलभूत हक्क" याचे वाचन कार्यक्रम (ठिकाण- ग्रामपंचायत कार्यालय) | डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |

उपरोक्त कार्यक्रमाव्यतिरिक्त पुढील जाहिरात मोहिम राबविण्यात यावी.

| **अ.क्र.** | **करावयाची कामे** | **अंमलबजावणी करणारी यंत्रणा** |
|---|---|---|
| १ | जय महाराष्ट्र व दिलखुलास कार्यक्रमात संविधान सप्ताहनिमित्त मान्यवरांच्या मुलाखती आयोजत करणे | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय |
| २ | सोशल मिडियामार्फत संविधान सप्ताहाची प्रसिद्धी करणे | डॉ. बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठान, नागपूर |
| ३ | रेडिओ जिंगलमार्फत संविधान सप्ताहाची प्रसिद्धी करणे | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय |
| ४ | दूरदर्शन व विविध चॅनलवर स्क्रोलद्वारे प्रसिद्धी | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय |
| ५ | एलईडी स्क्रीनद्वारे प्रसिद्धी | डॉ. बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठान, नागपूर व डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| ६ | विविध चॅनलवर पॅनल स्वरुपाचे चर्चासत्र | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय |

| | | |
|---|---|---|
| ७ | जिल्हा प्रशासन, जिल्हा माहिती अधिकारी, जिल्हा पत्रकार संघ, जिल्हा बार असोसिएशन व जिल्हा समाज अधिकारी यांच्या सहभागाने जिल्हा मुख्यालय ठिकाणी चर्चासत्र आयोजित करणे | डॉ. बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठान, नागपूर व डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे |
| ८ | वृत्तपत्रात जाहिरातीद्वारे प्रसिद्धी | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय |

सदर जाहिरात मोहिम राबविण्यासाठी कमी कालावधी शिल्लक असल्याने, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- मावज-२०१७/प्र.क्र.३७६/३४, दि. २१ मे, २०१८ नुसार कार्यवाही करावी.

दि. २६ नोव्हेंबर ते दि. २ डिसेंबर, २०१८ या कालावधी दरम्यान होणा-या संविधान सप्ताहासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्थेअंतर्गत कार्यरत ४३० समतादूत प्रत्येक तालुका, जिल्ह्यामध्ये उपलब्ध करुन देण्यात यावेत. तसेच सर्व जिल्हा स्तरावरील कार्यक्रमाचे समन्वय सहायक आयुक्त, समाज कल्याण यांनी करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१८१११६१४४८४१७५२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by S.G. Patil
Date: 2018.11.16 14:54:44 +05'30'

( सं. गि. पाटील )

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
६. आयुक्त, आरोग्य सेवा संचालनालय
७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा
८. आयुक्त, शालेय शिक्षण
९. संचालक, उच्च शिक्षण
१०.महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था
११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१२.राज्य समादेशक, होमगार्ड

१३.मुख्य समन्वयक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर समता प्रतिष्ठान, नागपूर

१४.संचालक, सांस्कृतिक कार्य

१५. सर्व जिल्हाधिकारी

१६.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

१७.सर्व कुलगुरु, विद्यापीठ

१८. सर्व आयुक्त, महानगरपालिका

१९.सर्व पोलीस आयुक्त/ जिल्हा पोलीस अधिक्षक

२०.सर्व शिक्षणाधिकारी, माध्यमिक/प्राथमिक

२१.सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण

२२.सर्व जिल्हा समादेशक, होमगार्ड

२३.सर्व मनपा/न.पा. अग्निशामन अधिकारी, महाराष्ट्र अग्नीशमन सेवा

२४.सर्व जिल्हा शल्य चिकित्सक, आरोग्य सेवा

२५.सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद

२६.सर्व जिल्हा माहिती अधिकारी (जनसंपर्क विभाग)

२७.सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी

२८. मुख्य प्रकल्प संचालक, समतादूत प्रकल्प, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे

२९.निवडनस्ती.